गोपनीय

महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील नियम ९—

शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याने शिक्षेचे अंतिम आदेश काढण्यापूर्वी अपचारी अधिकारी/कर्मचाऱ्यास चौकशी अहवालाची प्रत पुरविणे

महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

परिपत्रक क्रमांक सीडीआर-१०९१/सीआर-६७/९१/अकरा,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २८ जुलै १९९२.

परिपत्रक

ज्या शिस्तभंगविषयक प्रकरणांमध्ये शिस्तभंगविषयक प्राधिकारी हा स्वत: चौकशी अधिकारी नसतो (म्हणजेच शिस्तभंगविषयक प्राधिकारी व चौकशी अधिकारी जेंव्हा वेगवेगळे असतात) अशा प्रकरणांमध्ये चौकशी अधिकाऱ्याचा चौकशी अहवाल विचारात घेऊन संबंधित शासकीय सेवकावर शिक्षेचे अंतिम आदेश बजावण्यापूर्वी चौकशी अहवालाची प्रत संबंधित शासकीय सेवकास पुरविण्यात येऊन चौकशी अहवालातील निष्कर्षांबाबत त्याचे म्हणणे, शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्यापुढे मांडण्याची संधी देण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. ही बाब भारतीय संविधानाच्या कलम ३११(२) च्या तरतुदी तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील नियम ९ व ११ व सर्वोच्च न्यायालयाच्या खंडपीठाचा निर्णय लक्षात घेऊन तपासण्यात आली आहे.

२. मोहम्मद रमझानखान विरुद्ध केंद्र शासन व इतर यांच्या दरम्यान झालेल्या दाव्यासंबंधी सर्वोच्च न्यायालयाच्या खंडपीठाने असा निर्णय दिला आहे की, ज्या ज्या प्रकरणांमध्ये चौकशी अधिकारी, चौकशीअंती, अपचारी हा एक किंवा सर्व दोषारोपांस्तव दोषी असल्याच्या निष्कर्षांप्रत येऊन, शिक्षेच्या शिफारशीसह अथवा शिक्षेची शिफारस न करता आपला अहवाल शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याकडे सादर करतो तेंव्हा अशा प्रकरणांमध्ये या चौकशी अहवालाची प्रत अपचाऱ्यास मिळण्याचा हक्क प्राप्त होतो व अपचाऱ्याची इच्छा असल्यास, त्या अहवालावर त्याची बाजू मांडण्याची/अभिवेदन करण्याचा हक्क त्यास प्राप्त होतो. असा चौकशी अहवाल अपचाऱ्यास न देणे म्हणजे नैसर्गिक न्यायाचे तत्त्व उल्लंघिल्यासारखे होईल.

३. वरील निर्णयाच्या संदर्भात ही बाब विधी व न्याय विभागाच्या सल्ल्याने तपासण्यात आली व आता असे ठरविण्यात आले आहे की, ज्या ज्या प्रकरणात महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ८ प्रमाणे विभागीय चौकशी करण्यात येते व शिस्तभंगविषयक प्राधिकारी व चौकशी अधिकारी भिन्न असल्यास, अशा सर्व प्रकरणांमध्ये संबंधित शासकीय सेवकास खाली नमूद केलेल्या पृष्ठांकनाद्वारे चौकशी अहवालाची प्रत देण्यात यावी.

"चौकशी अधिकाऱ्याचा अहवाल सोबत पाठविण्यात येत आहे. चौकशी अहवाल विचारात घेऊन शिस्तभंगविषयक प्राधिकारी योग्य तो निर्णय घेतील. आपल्याला (चौकशी अहवालाच्या अनुषंगाने) जर काही लेखी अभिवेदन/निवेदन सादर करावयाचे असेल, तर हे पत्र मिळाल्यापासून १५ दिवसांच्या आत असे अभिवेदन शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याकडे सादर करावे."

४. वरील सूचना हे परिपत्रक निर्गमित केल्याच्या दिनांकापासून परिणामकारक ठरतील व शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याने अद्यापि अंतिम निर्णय घेतलेला नाही, अशाच प्रकरणांमध्ये त्या लागू होतील, जुन्या प्रकरणांचा पुनर्विचार करण्याची आवश्यकता नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. ग. मंडपे,
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपालांचे सचिव.
मुख्यमंत्र्यांचे सचिव.
सर्व मंत्री, राज्यमंत्री आणि उपमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.
सर्व सचिव.
सर्व मंत्रालयीन विभाग.
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागाच्या अधिन असलेल्या सर्व विभागांचे विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.
निवड नस्ती.

**Confidential**

*Rule-9 of M.C.S.(D & O)Rules, 1979*—Supply of copy of inquiry report to the accused Government servant before passing final orders by the disciplinary authority.

GOVERNMENT OF MAHARASHTRA
GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT
Circular No. CDR-1091/CR-67/91/XI
Mantralaya, Bombay 400 032, dated the 28th July 1992.

## *CIRCULAR*

The question whether in cases, where the disciplinary authority itself is not the inquiry officer, a copy of the inquiry report should be furnished to the accused Government servant to enable him to make his submissions, if any, before the disciplinary authority in regard to the findings of the report, before such authority passes its final orders, has been examined. The Constitutional requirements laid down in Article 311 (2) of the Constitution of India, the provisions of rule 9 and 11 of the Maharashtra Civil Service (D & A) Rules, 1979 and the rulings of the Supreme Court on the matter have been kept in view.

2. The Division bench of the Supreme Court in the case of Mohd. Ramzan Khan V. Union of India and others have held that "wherever there has been an Inquiry Officer, and he has furnished a report to the disciplinary authority at the conclusion of the inquiry, holding the delinquent guilty of all or any of the charges with proposal for any particular punishment or not, the delinquent is entitled to a copy of such report and will also be entitled to make a representation against it, if he so desires, and non-furnishing of the report would amount to violation of rules of natural justice.

3. In the light of aforesaid judgement the matter has been examined in consultation with the Law and Judiciary Department and it has been decided that in all cases, where an inquiry has been held in accordance with the provisions of rule 8 of the Maharashtra Civil Services (D & A) Rules, 1979, the disciplinary authority, if it is different from the inquiry authority should before making a final order in the case, forward a copy of the inquiry report to the Government servant concerned with the following endorsement.

"The report of the Inquiry Officer is enclosed. The Disciplinary Authority will take a suitable decision after considering the report. If you wish to make any representation or submission, you may do so in writing to the Disciplinary Authority within 15 days of receipt of this letter."

4. The aforesaid instructions will operate prospectively from the date of issue and accordingly will apply only in cases where the disciplinary authority is yet to pass orders. Past cases need not be reopened for consideration.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

A. G. MANDPE,
Deputy Secretary to Government.

To

The Secretary to the Governor,
The Secretary to the Chief Minister,
The Personnel Assistant to all Ministers and Ministers of State.
All Secretaries to Government,
All Departments of the Mantralaya,
All Heads of Departments and Heads of Offices under the several Departments of the Mantralaya.